ताब्यात घेतलेल्या खाजगी वनाचे सर्वेक्षण व सिमांकन या योजनेचा सन २०१४-१५ करिता चालू बाब प्रस्ताव.. (४४०६-००७१).

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :-एस-१०/२०१४/प्र.क्र.२०५/फ-३**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

दिनांक :- ३१ जानेवारी, २०१५

वाचा :-

१) अपर प्रधान मुख्य वनंसरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) यांचे पत्र क्र.- कक्ष-१/पी/यो/ चाबाप्र/प्र.क्र.३९/(१४-१५)/३९८. दिनांक ९ जून, २०१४.

२) शासन निर्णय समक्रमांक दिनांक २०.०९.२०१४.

१) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अंदाज-२०१४/प्र.क्र.११०/अर्थ-३, दि. १ जुलै, २०१४.

२) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.पुरक-२०१४/प्र.क्र.५८९/अर्थसंकल्प-३,दि. १.१.२०१५.

५) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अंदाज-२०१४/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि. २.१.२०१५

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र खाजगी वने (संपादन) अधिनियम, १९७५ अंतर्गत संपादित क्षेत्राचे सर्वेक्षण व सिमांकन करणे आवश्यक आहे. त्यासाठी सन २०१४-१५ मध्ये एकूण २१३.७६ कि.मी. लांबीच्या सर्वेक्षण व सिमांकन कामासाठी रु. २६.७५ लक्ष रकमेची आवश्यकता आहे. याबाबत संदर्भांकित क्र.२ च्या प्रत्रान्वये प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचेकडून प्रस्ताव प्राप्त झाला असून त्यानुसार या प्रयोजनासाठी सन २०१४-१५ वर्षासाठी रु. २६.७५ लक्ष निधी मंजूर करण्याबाबत प्रस्तावित करण्यात आले आहे.

**शासन निर्णय :**

राज्ययोजना -" ताब्यात घेतलेल्या खाजगी वनाचे सर्वेक्षण व सिमांकन" (४४०६ ००७१) या योजनेचा रु.२६.७५ लक्ष एवढया रकमेचा सन २०१४-१५चा प्रस्ताव प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सादर केला होता. याकरीता सन २०१४-२०१५ या आर्थिक वर्षासाठी रु.२६.७५ लक्ष नियतव्यय निश्चित करण्यात आला होता. त्यापैकी रु.१८.७२ लक्षची तरतुद अर्थसंकल्पित करण्यात आली होती.

वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक ३ येथील दिनांक १.७.२०१४ च्या परिपत्रकानुसार अर्थसंकल्पीत रक्कम रु.१८.७२ लक्ष रकमेच्या ६०% च्या मर्यादेत रु. ११.२३ लक्ष इतका निधी वितरित व खर्च करण्यास

उपरोक्त संदर्भ क्र. २ अनुसार मान्यता देण्यात आली आहे. आता वित्त विभागाचे संदर्भ क्रमांक ४ च्या परिपत्रकानुसार प्रस्तुत योजनेच्या उर्वरीत नियतव्यय अर्थसंकल्पीत करण्यात आला आलेला असल्याने संदर्भ क्र.३ येथील वित्त विभागाच्या परिपत्रकानुसार एकूण रु.२६.७५ लक्षच्या ६०% प्रमाणे रु.१६.०५ लक्ष इतकी रक्कम वितरीत करता येऊ शकते. त्यापैकी संदर्भ क्र.२ नुसार यापूर्वी रु.११.२३ लक्ष वितरीत करण्यात आलेले आहे. त्यामुळे उर्वरीत रक्कम **रु.४.८२ लक्ष** इतका निधी वितरित व खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

सदर खर्च हा मागणी क्रमांक- सी-१०, ४४०६ वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च, राज्य योजनांतर्गत योजना, ताब्यात घेतलेल्या खाजगी वनांचे सर्वेक्षण व सिमांकन (४४०६-००७१) या शीर्षाखाली दर्शविण्यात यावा व सन २०१४-१५ मध्ये मंजूर अर्थसंकल्पिय अनुदानातून भागविण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या परिपत्रक क्र.अंदाज-२०१४/प्र.क्र.११०/अर्थ-३, दिनांक १.७.२०१४ च्या परिपत्रकान्वये विभागास प्रदान करण्यातआलेल्या अधिकारास तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.४६/२०१५/व्यय-१०, दिनांक २८.१.२०१५ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०२०२१२३५२१३११९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

TIWARI VIRENDRA RAMBAHAL

Digitally signed by TIWARI VIRENDRA RAMBAHAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST,CID - 917243, postalCode=400032, st=Maharashtra, cn=TIWARI VIRENDRA RAMBAHAL
Date: 2015.02.02 12:44:04 +05'30'

( वीरेंद्र तिवारी )
मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)
महसूल व वन विभाग

**प्रत :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.

३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण) महाराष्ट्र राज्य, नागपूर

४) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), धुळे.

५) मुख्य वनसंरक्षक (भूमी अभिलेख कक्ष), नागपूर.

६) मुख्य वनसंरक्षक (भूमी अभिलेख), पनवेल.

७) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.

८) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

९) वित्त विभाग, व्यय १०/ अर्थसं-४ मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

१०) कार्यासन अधिकारी (फ-२) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

११) कार्यासन अधिकारी, ब-१, जागतीक व्यापार केंद्र, कफ परेड, मुंबई.

१२) निवडनस्ती, कार्यासन (फ-३), म.व.व.वि., मंत्रालय, मुंबई-३२.

*************